सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी तालुका क्रीडा संकुलांना अनुदान वितरीत करणेबाबत-
लेखाशिर्ष (२२०४-१७९२)

महाराष्ट्र शासन
शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
शासन निर्णय क्रमांकः ताक्रीसं ३४२५/प्र.क्र.१७/क्रीयुसे-१
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३०.
दिनांक : ३१/३/२०२५.

वाचा :-

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय व क्रीडा विभाग क्रमांक:राक्रीधो-२००३/(प्र.क्र.११/०३)/ क्रीयुसे-१, दिनांक २६ मार्च, २००३.
२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक:राक्रीधो-२००९/(प्र.क्र.२५/०९)/ क्रीयुसे-१, दिनांक २१ मार्च, २००९.
३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.राक्रीधो-२०१९/प्र.क्र.९२/क्रीयुसे-१, दिनांक २३ मार्च, २०२२.
४) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. पुमाप्र-३४२४/प्र.क्र ११९/क्रीयुसे-१, दिनांक १५/१०/२०२४.
५) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा संचानालय, यांचे क्र. ताक्रीसं /निमा/२०२४-२४/का-९/४०९५, दिनांक २४/१/२०२५ रोजीचे पत्र.
६) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.पुनिर्वि-२८२४/प्र.क्र. ९९/अर्थसंकल्प , दिनांक २९ मार्च, २०२५.
७) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०२४/प्र.क्र ८०/अर्थ -दिनांक १७/३/२०२५.
८) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांकः ताक्रीसं ३४२५/प्र.क्र.१७/क्रीयुसे-१, दिनांक ३१/३/२०२५.

प्रस्तावना :-

राज्य क्रीडा धोरणातंर्गत विभागीय/जिल्हा/तालुका स्तरावर क्रीडा संकुले उभारण्यासाठी संदर्भ क्र.१ येथील दिनांक २६ मार्च, २००३ रोजीच्या शासन निर्णयान्वये अनुदान योजना कार्यान्वित करण्यात आलेली आहे. या योजनेअंतर्गत संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णय, दिनांक २३ मार्च, २०२२ अन्वये क्रीडा संकुलांच्या अनुदान मर्यादेत पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात आली आहे:-

(१) अद्याप प्रशासकीय मान्यता न दिलेल्या अथवा प्रशासकीय मान्यता दिलेली आहे परंतु, अद्याप प्रत्यक्ष बांधकाम सुरु झालेले नाही, अशा क्रीडा संकुलांच्या बाबत अनुदान मर्यादा खालीलप्रमाणे विहित करण्यात आली आहे:-

| क्रीडा संकुलाचा प्रकार | पूर्वीची अनुदान मर्यादा (रु.लाखात) | सुधारीत अनुदान मर्यादा (रु.लाखात) |
|---|---|---|
| तालुका क्रीडा संकुल | रु. १००.०० लक्ष | रु. ५००.०० लक्ष |
| जिल्हा क्रीडा संकुल | रु. ८००.०० लक्ष | रु.२५००.०० लक्ष |
| विभागीय क्रीडा संकुल | रु.२४००.०० लक्ष | रु.५०००.०० लक्ष |

(२) क्रीडा संकुलांच्या अंदाजपत्रकांना/सुधारीत अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता दिलेली आहे व बांधकाम पूर्ण झाले आहे अथवा प्रगतीपथावर असलेल्या/अपूर्ण असलेल्या क्रीडा संकुलांच्या बाबत अनुदान मर्यादा पुढीलप्रमाणे विहित करण्यात आलेली आहे:-

| क्रीडा संकुलाचा प्रकार | पूर्वीची अनुदान मर्यादा (रु.लाखात) | सुधारीत अनुदान मर्यादा (रु.लाखात) |
|---|---|---|
| तालुका क्रीडा संकुल | रु. १००.०० लक्ष | रु. ३००.०० लक्ष |
| जिल्हा क्रीडा संकुल | रु. ८००.०० लक्ष | रु.१५००.०० लक्ष |
| विभागीय क्रीडा संकुल | रु.२४००.०० लक्ष | रु.३०००.०० लक्ष |

३. दिनांक २३ मार्च, २०२२ रोजीच्या शासन निर्णयासोबत जोडलेल्या अनुक्रमे परिशिष्ट-अ, परिशिष्ट-ब व परिशिष्ट-क मध्ये विहित केल्यानुसार विभागीय/जिल्हा/तालुका क्रीडा संकुलासाठी क्रीडा सुविधांविषयक टाईप प्लॅन्स विहित केले असून, परिशिष्ट-ड मध्ये त्यासंदर्भातील सर्वसाधारण अटी/ शर्ती विहित केलेल्या आहेत.

४. मागणी क्र.ई-३, अंतर्गत लेखाशिर्ष, २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (१६) क्रीडा संकुल, (१०) (०२) क्रीडा प्रशिक्षण केंद्राची स्थापना, तालुका क्रीडा संकुल बांधकाम, ३१ सहा. अनुदान, २२०४-१७९२ या लेखाशिर्ष योजने अंतर्गत सन २०२४-२५ मध्ये रु. १००००.०० लक्ष अर्थसंकल्पिय तरतुद मंजुर झालेली आहे. त्यापैकी संदर्भिय क्र. ५ अन्वये शासन निर्णय दि.१५.१०.२०२४ नुसार ६१ तालुका क्रीडा संकुलाना अनुदान वितरीत करण्यात आले आहे.

तसेच अर्थसंकल्प कार्यासनाच्या संदर्भ क्र.७ येथील शासन निर्णयान्वये, पुनर्विनियोजन रु.३०००.०० लक्ष निधी उपलब्ध करुन देण्यात आला असून त्यानुसार तसेच अर्थसंकल्पित तरतुदीप्रमाणे सदंर्भिय क्र. ८ अन्वये ६३ तालुका क्रीडा संकुलाना रु ७०००.०० लक्ष निधी वितरीत करण्यात आला आहे.

आता मूळ अर्थसंकल्पिय तरतूदीपैकी उर्वरित रु. ७५.०० लक्ष निधी तालुका क्रीडा संकुलास वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मागणी क्र.ई-३, अंतर्गत लेखाशिर्ष, २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (१६) क्रीडा संकुल, (१०)(०२) क्रीडा प्रशिक्षण केंद्रांची आस्थापना (कार्यक्रम), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर),संगणक क्रमांक २२०४ -१७९२ या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी अर्थसंकल्पीत तरतूदीमधून खालील परिशिष्ट अ प्रमाणे तालुका क्रीडा संकुला त्यांच्या नावासमोर दर्शविल्यानुसार ७५.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

| अक्र | तालुका क्रीडा संकुलाचे नाव (लेखाशिर्ष २२०४- १७९२) | मान्यता दिलेली अंदाजपत्रकीय रक्कम (रु.लक्ष) | यापूर्वी वितरीत अनुदान (रु.लक्ष) | या शासन निर्णयान्वये अनुदान वितरीत (रु.लक्ष) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | इंदापूर जि. पुणे | ६७९.८७ | ४००.०० | ७५.०० |
| | एकुण रु. पंच्याहत्तर लक्ष फक्त | | | ७५.०० |

२. वरीलप्रमाणे मंजूर निधी खालील अटी/शर्तीच्या अधिन राहून तसेच, बांधकामाच्या प्रगतीनुसार वितरीत करण्यात यावा:-

I. संबंधित क्रीडा संकुलाचे बांधकाम आराखडे, सुधारीत अंदाजपत्रक व निधीबाबत आवश्यकतेनुसार राज्य क्रीडा विकास समितीने दिलेल्या मान्यतेच्या अधिन राहून निधी मंजूर करण्यात येत आहे.

II. संबंधित तालुका क्रीडा संकुलाचे बांधकाम आराखडे व सुधारीत अंदाजपत्रकास आवश्यकतेनुसार विहित प्राधिकाऱ्यांची तसेचराज्य क्रीडा विकास समिती ,ची मान्यता आवश्यक राहील.

III. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार व मान्य निकषानुसार खर्च करावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा असेल, त्याचवेळी आहरीत करावा. शासन लेख्याबाहेरील बँक खात्यात सदर निधी ठेवण्यात येऊ नये.

IV. निधी वितरणाबाबत वित्त विभागाद्वारे वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेले वित्त विषयक विविध आदेश/नियम/ शासन निर्णय व वित्तीय अधिकार नियमपुस्तिकेतील तरतूदी यांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

V. सदरचा निधी ज्या प्रयोजनाकरिता / ज्या बाबींकरीता मंजूर करण्यात आला आहे, त्याच बाबींसाठी खर्च करण्यात यावा. निधीच्या विनियोगाबाबत उपयोगिता प्रमाणपत्र विहित कालावधीत सादर करावे.

VI. यासंदर्भात शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक १७.३.२०२५ मधील तरतूदीनुसार निधी खर्च करण्याची कार्यवाही करण्यात यावी.

३. उपरोक्त बाबीवरील खर्च "मागणी क्रमांक ई-३, २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (१६) क्रीडा संकुल, (१०) (०२) क्रीडा प्रशिक्षण केंद्रांची आस्थापना (कार्यक्रम), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)," संगणक क्रमांक (२२०४ १७९२), या लेखाशीर्षासाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता उपलब्ध तरतूदीमधून भागविण्यात यावा.

४. यानुसार मंजूर रक्कम कोषागारातून आहरित करण्यासाठी जिल्हा क्रीडा अधिकारी, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. सदरचा शासन निर्णय, नियोजन विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र २९८/१४७१, दिनांक १३/८/२०२४ व वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.९५१/व्यय-५, दिनांक २/९/२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेताक २०२५०३३११५०३५६१३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सोबत: वरीलप्रमाणे.

RANSING ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=9651a3c25d5e1f106e47059f72760ff520f9b00f67c3e9186e40ed4bd4fbaee6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=41EC78BC14804BABDC24C7FD31BA9FBF63804F499D4335774E27423E40136397, cn=RANSING ANANDRAO DERE
Date: 2025.03.31 15:04:58 +05'30'

**( रणसिंग डेरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
३) मा.उपमुख्यमंत्री (नगर विकास /गृहनिर्माण) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
४) मा.उपमुख्यमंत्री(वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
५) मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) महाराष्ट्र राज्य ,यांचे स्वीय सहायक, मुंबई.

७) सर्व सन्मा.विधानपरिषद/ विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
८) अपर मुख्य सचिव,( अ.का) क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
९) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१०) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), १ / २, महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
११) महालेखापाल (लेखा परिक्षा), १ / २, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१२) विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा पुणे (क्रीडा संचालनालयामार्फत)
१३) संबंधित अधिदान व लेखाधिकारी, (क्रीडा संचालनालयामार्फत)
१४) जिल्हा क्रीडा अधिकारी, पुणे (क्रीडा संचालनालयामार्फत)
१५) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे ( क्रीडा संचालनालयामार्फत)
१६) वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे ( क्रीडा संचालनालयामार्फत)
१७) वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई,
१८) अवर सचिव (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९) निवड नस्ती (क्रीयुसे-१).